**निरीक्षक, वैधमापन शास्त्र, उस्मानाबाद विभाग या कार्यालयाच्या कार्यकारी मानक प्रयोगशाळेच्या बांधकामाकरीता प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत.....**

# महाराष्ट्र शासन

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : वैमाशा-२०१९/१०९/प्र.क्र.२८/ग्रा.सं.-३**

दुसरा माळा, मंत्रालय (विस्तार),
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १९ मार्च, २०२०

**संदर्भ** - १) नियंत्रक, वैध मापन शास्त्र,मुंबई यांचे पत्र क्र.वैमाशा-८/ लेखा/ का.मा.प्र./ उस्मानाबाद/२०१९/२६३४, दि.२०.१२.२०१९
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचे पत्र क्र. मुअऔ/२०२०/का.१२/इमा/उ.बाद/८६८, दि.२ मार्च, २०२०.

**शासन निर्णय:-**

नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांनी संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये निरीक्षक वैधमापन शास्त्र, उस्मानाबाद या कार्यालयासाठी कार्यकारी मानक प्रयोगशाळेच्या बांधकामाकरीता रु.७३,८०,०००/- इतक्या खर्चाचे अंदाजपत्रक शासनास सादर केले आहे. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांनी संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये सदर अंदाजपत्रकास तांत्रिक सहमती दर्शवलेली असून शिफारशीसह प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केले आहे. त्यानुसार निरीक्षक, वैध मापन शास्त्र, उस्मानाबाद यांच्या कार्यालयासाठी कार्यकारी मानक प्रयोगशाळेच्या बांधकामासाठी रू.७३,८०,०००/- (अक्षरी रूपये त्र्याहत्तर लाख ऐंशी हजार फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त प्रयोजनार्थ या आदेशान्वये रू.७३,८०,०००/- इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर प्रयोजनार्थ सहायक नियंत्रक, वैध मापन शास्त्र, लातूर व उस्मानाबाद यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर निधी संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचेकडे हस्तांतरीत करावा.

३. उपरोक्त खर्च मागणी क्रमांक, एम-५ मुख्य लेखाशिर्ष ५४७५ इतर सर्वसाधारण आर्थिक सेवांवरील भांडवली खर्च ८०० इतर खर्च (००) (०१) वजने व मापे यांच्या पायाभूत सुविधांचे बळकटीकरण (योजनांतर्गत) (५४७५ ०२४८) ५३ मोठी बांधकामे या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. व तो सन २०१९-२० या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/१३/ विनियम (भाग-२), दि.२०.०९.२०१९, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग पहिला, उप विभाग- पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका, परिच्छेद क्र.१३४ (१) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२००३१९१७१५४३६१०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SURESH DNYANDEO REDEKAR

Digitally signed by SURESH DNYANDEO REDEKAR
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=00b6deeb0e386eb5698cc129016108429cd770a158e87c3a2a9613
4dccfff610, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=b0c49d4a2d63d7827dd22b5ccbfc134f691b42353bcee54455
b220aff75b429c, ou=FOOD SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPT,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SURESH DNYANDEO REDEKAR
Date: 2020.03.20 11:34:57 +05'30'

**( सु. ज्ञा. रेडेकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१.महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
२.महालेखापाल-१, (लेखा व परीक्षा), मुंबई / नागपूर
३.नियंत्रक,वैध मापन शास्त्र, मुंबई.
४.वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
५.जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर
६.उप नियंत्रक,वैध मापन शास्त्र, औरंगाबाद विभाग
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, उस्मानाबाद.
८. सहायक नियंत्रक,वैध मापन शास्त्र लातूर व उस्मानाबाद जिल्हे
९.वित्त विभाग (विनियम), मंत्रालय, मुंबई
१०.निवडनस्ती, (ग्रा.सं.-३).